क्वीन मेरी तंत्र शाळा, खडकी, पुणे
<u>वेल्डार पाठ्यक्रमास सहाय्यक अनुदान देणेबाबत.</u>

महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय, क्र.बीयुडी-२००९/१२०१/प्रक्र.२०२/२००९/२८,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : १७.०२.२०१०.

<u>वाचा</u>: १) शासन निर्णय, गृह विभाग (विशेष) क्र.एसबी.२/एमआयएस.१०७०/५०३५४, दिनांक २४/०३/१९७२.
२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.एसएसबी.१०७५/२३३३/२८, दिनांक २९/०३/१९७६.
३) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.एसएसबी.१०७५/२३३३/२८, दिनांक २३/०३/१९७८.
४) शासन निर्णय, क्र.बीयुडी-२००३/२११५/(प्रक्र.४/२००४)/२८, दिनांक २८ एप्रिल, २००६
५) संचालक, सैनिक कल्याण विभाग यांचे पत्र क्र.१५४०५/क्यु.एम.टी.आय./सैकवि-१९, दिनांक १० सप्टेंबर, २००९.

<u>प्रस्तावना</u> :

क्वीन मेरी तंत्र शिक्षण संस्था, खडकी, पुणे ही संस्था खाजगी संस्था असून माजी अपंग सैनिकांना त्यांच्या पायावर उभे रहाण्यासाठी तांत्रिक विषयांचे प्रशिक्षण देते. संपूर्ण भारतात या उद्देशासाठी चालविण्यात येणारी ही एकमेव संस्था असून त्यामध्ये अधिकतर महाराष्ट्राचे रहिवासी असलेले माजी अपंग सैनिक शिक्षण घेतात. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.एसएसबी १०७५/२३३३/२८, दिनांक २३/३/१९७८ अन्वये उपरोक्त संस्थेमार्फत चालविण्यात येत असलेल्या ५ अभ्यासक्रमांसंबंधात प्रशिक्षकांच्या वेतनाच्या खर्चाच्या १/२ हिश्शा इतकी (५०%) रक्कम अनुदान स्वरुपात संस्थेस देण्याची जबाबदारी शासनाने स्वीकारलेली असून शासनाकडून संस्थेला संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे यांचेमार्फत हे अनुदान मंजूर केले जाते.

२. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.बीयुडी-२००३/२११५/(प्रक्र.४/२००४)/२८, दिनांक २८ एप्रिल, २००६ अन्वये क्वीन मेरी तंत्र शाळा, खडकी, पुणे या संस्थेत शिकविल्या जाणा-या पुढील पाठ्यक्रमांना मान्यता देण्यात आली होती :

<u>पाठ्यक्रम</u> :-

१) रेडिओ, टी.व्ही.मॅकेनिक
२) स्टेनोग्राफी (इंग्रजी)
३) डिझेल मॅकेनिक / फिटर
४) इलेक्ट्रीशियन
५) कटिंग व टेलरिंग

<u>शासन निर्णय</u> :-

क्वीन मेरी तंत्र शाळा, खडकी, पुणे या संस्थेत शिकविले जाणारे स्टेनोग्राफी (इंग्रजी) आणि रेडिओ, टी.व्ही. मेकॅनिक हे दोन्ही कोर्सेस अल्प प्रतिसादामुळे अनुक्रमे सन २००० व २००२ पासून शिकविणे बंद करण्यात आले असून केंद्र शासनाच्या मान्यतेनुसार सन १९९८ पासून वेल्डर पाठ्यक्रम

सुरू करण्यात आला आहे. सबब शासनाने आता असा निर्णय घेतला आहे की, संदर्भाधीन अ.क्र.(४) येथील शासन निर्णयान्वये क्वीन मेरी तंत्र शाळा, खडकी, पुणे यांना तंत्र शाळेत शिकविल्या जाणा-या पाठ्यक्रमांपैकी रेडिओ, टी.व्ही.मेकॅनिक तसेच स्टेनोग्राफी (इंग्रजी ) या पाठ्यक्रमांना असणारी मान्यता रद्द करण्यात येत असून वेल्डर या पाठ्यक्रमास सन १९९८-१९९९ पासून पूर्वलक्षी प्रभावाने मान्यता देण्यात येत आहे.

२. ह्या प्रस्तावावर होणारा खर्च हा "मागणी क्र.ए-५, २२३५-सामाजिक सुरक्षा व कल्याण, ६०-इतर सामाजिक सुरक्षा व कल्याण कार्यक्रम, २००-इतर कार्यक्रम (००)(०४) क्वीन मेरी तंत्र शाळेस सहाय्यक अनुदान (संकेतांक क्र.२२३५ ००६२)" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व त्या वित्तीय वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१००२१७१३२६४९००१ आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

सही/-
( अ.द.जोशी )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

संचालक, सैनिक कल्याण विभाग, महाराष्ट्र राज्य, रायगड, राष्ट्रीय युध्द स्मारकासमोर, घोरपडी,पुणे-४११ ००१ (पाच प्रती)
उप संचालक, क्वीन मेरी तंत्रशाळा, रेंज हिल्स, पुणे-२०.
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता )-१, महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल (लेखा परीक्षा )-१, महाराष्ट्र, मुंबई,
जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा कोषागार कार्यालय, पुणे.,
उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
सामान्य प्रशासन विभाग/कार्यासन क्र.२५, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
निवड नस्ती (२ प्रती),